राज्यात मत्स्यबीज प्रमाणीकरण व मत्स्यबीज केंद्रांचे प्रमाणन प्रणाली लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. मत्स्यवि - २०१८/प्र.क्र.६४/पदुम-१३,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक -०२ नोव्हेंबर, २०१८

वाचा: १. केंद्र शासनाचे कृषि मंत्रालय पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभागाचे पत्र क्र.एफएनओ-३१०३६/०४/०७-एफवाय-३, दि.१३/०२/२०१५
२. आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे पत्र मत्स्य/भू/०२१५०६/३०/२०१०, दि.२६/१२/२०१७

**प्रस्तावना :-**

मत्स्यसंवर्धनाच्या प्रक्रियेमध्ये मत्स्यबीज ही पूर्व आवश्यक व महत्वाची बाब आहे. गुणवत्ता असलेल्या मत्स्यबीजामुळे खात्रीशीर मत्स्योत्पादन मिळते. तसेच तलावाची उत्पादकता वाढल्याने यशस्वी व शाश्वत मत्स्यव्यवसाय उद्योजकता वाढीस लागेल. जागतिक पातळीवर ग्राहकांच्या वाढत्या मागणीमुळे मत्स्यबीजाच्या प्रमाणन प्रणालीस गती मिळाली आहे. सदरची प्रणाली ही राज्यातील सर्व (खाजगी / शासकीय व इतर) मत्स्यबीज उत्पादन केंद्रे, संगोपन/ संवर्धन केंद्रे, मत्स्यजीरे, मत्स्यबीज, मत्स्यबोटुकली, नॉप्लीया, पोस्टलार्व्हा, मत्स्यप्रजनक यांचे संवर्धन/संगोपन इत्यादी सर्वांसाठी लागू राहील. तसेच सदरच्या प्रणालीमुळे यात पर्यावरण विषयक बाबींची सांगड घातलेली असल्याने मत्स्यबीजाची गुणवत्ता राखणे व राज्यात शाश्वत मत्स्योत्पादन घेणे शक्य होईल. भारत सरकार, कृषि भवन यांचे संदर्भ १ चे पत्रान्वये निर्देशित केल्याप्रमाणे महाराष्ट्र राज्यात मत्स्यबीजाचे प्रमाणीकरण (Certification) तसेच मत्स्यबीज केंद्राचे प्रमाणन (Accreditation) प्रणाली जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

केंद्र शासनाने संदर्भ क्र. १ चे पत्रान्वये दिलेल्या निर्देशानूसार शासन मत्स्यबीजाचे प्रमाणीकरण व मत्स्यबीज केंद्राचे प्रमाणन या बाबतच्या प्रणालीस पुढीलप्रमाणे मान्यता प्रदान करीत आहे.

१. उपरोक्त संदर्भांकित पत्रान्वये केंद्र शासनाने मत्स्यबीज उत्पादन केंद्र/ संवर्धन केंद्र ज्यामध्ये विविध प्रजातीच्या माशांचे जसे भारतीय प्रमुख कार्प, इतर कार्प, परदेशातून आयात केलेल्या प्रजाती असे एकूण संवर्धनक्षम सर्व मासे, गोडया तसेच निमखाऱ्या पाण्यातील कोळंबी, शोभिवंत मासे याचे संवर्धन करण्यासाठी आवश्यक साठवणूक तळी, संवर्धन व संगोपन तळी तसेच गोडे पाणी व खाऱ्या पाण्यात मत्स्य/कोळंबी/ इतर जलचर प्रजाती यांचे संवर्धन व संगोपन करणारी उत्पादन केंद्रे/संवर्धन केंद्रे यासाठी नोंदणीचे दृष्टीने पथदर्शक मार्गदर्शन सूचना निर्गमित केल्या आहेत.त्यानूसार राज्यातील सर्व संगोपन/ संवर्धन केंद्राची नोंदणी होणे बंधनकारक आहे. मात्र केंद्रीय तटीय जलकृषि यांचे कार्यक्षेत्रातील संवर्धन/संगोपन केंद्रांनी अथवा मत्स्यशेती साठी त्यांचेकडे नोंदणी करणे बंधनकारक आहे.

२. सदर मार्गदर्शक सूचना नूसार केंद्र शासनाचे निर्देशानूसार राज्यामध्ये जलकृषि/ मत्स्यशेती करणाऱ्यांसाठी राज्याच्या मार्गदर्शक सूचना लागू करणे आवश्यक आहेत. सदर मार्गदर्शक सूचना या गोडया पाण्यातील प्रजनन / संवर्धन / संगोपन/ साठवणूक तलाव, निमखाऱ्या पाण्यातील मत्स्यसंवर्धन, सर्व संवर्धनक्षम देशी व परदेशातून आणलेल्या माशांच्या प्रजाती तसेच गोडया व निमखाऱ्या पाण्यातील कोळंबीच्या प्रजाती, शोभिवंत माशांच्या प्रजाती यांना लागू राहतील.

अ. सक्षम प्राधिकाऱ्यांची परवानगी असल्याशिवाय कोणत्याही व्यक्तीस, सहकारी संस्थेस, खाजगी उद्योजकास खाजगी/भागीदारी कंपनीस संवर्धनक्षम मासे जसे भारतीय मेजर कार्प, देशी/विदेशी माशांच्या प्रजाती, एअर ब्रिदिंग फिश, गोडया पाण्यातील कोळंबी, निमखाऱ्या पाण्यातील कोळंबी, शोभिवंत मासे यांच्या सर्वांच्या संवर्धनक्षम प्रजाती यांचे संवर्धन/संगोपन हे प्रजनन/संवर्धन/ संगोपन/साठवणूक तलावात करता येणार नाही.

ब. शासनाने प्रतिबंध केलेल्या प्रजाती वगळता इतर सर्व संवर्धनक्षम देशी अथवा विदेशी प्रजातीचे संवर्धनक्षम देशी अथवा विदेशी प्रजातीचे संवर्धन मत्स्यकास्तकारास करता येईल.विदेशी प्रजातीचे संवर्धन हे सक्षम प्राधिकाऱ्याचे परवानगी मिळाल्यावर करता येईल.

क. केंद्र शासनाने संदर्भाधिन पत्रान्वये दिलेल्या निर्देशानूसार राज्य स्तरावर मत्स्यबीज प्रमाणीकरण व मत्स्यबीज केंद्राचे प्रमाणन करण्यासाठी समिती गठीत करणे बंधनकारक आहे. सदर समितीची कार्यकक्षा ही मत्स्यसंवर्धन केंद्रातून निर्मिती होणारे गुणवत्ता असलेले बीजांचे उत्पादन व केंद्राची उत्पादकता यांचे राज्यभर संनियंत्रण करणे अशी राहील. याच बरोबर बीज उत्पादन व त्याची गुणवत्ता यांचे नियंत्रण ही करेल. सबब ज्या उद्योजकांना संवर्धनक्षम देशी व विदेशी प्रजाती जसे कार्प, एअर ब्रिदिंग फिश, गोडया व निमखाऱ्या पाण्यातील कोळंबी, इतर संवर्धनक्षम प्रजाती शोभिवंत माशांच्या प्रजाती इत्यादीसाठी राज्य शासनाच्या मत्स्यबीज प्रमाणीकरण व मत्स्यबीज केंद्राचे प्रमाणन करण्याऱ्या समितीची प्रथम मान्यता घेणे बंधनकारक राहील. तसेच संगोपन/संवर्धन/साठवणूक तलावामध्ये गोडेपाणी अथवा निमखाऱ्या पाण्यातील प्रजातीचे संवर्धन/संगोपन करण्यासाठी तसेच विविध प्रजातीच्या वापरासाठी राज्यातील मत्स्यबीज प्रमाणीकरण व मत्स्यबीज केंद्राचे प्रमाणन करणाऱ्या राज्य स्तरीय शिखर समितीची मान्यता घेणे बंधनकारक आहे.

राज्य स्तरीय शिखर समितीची रचना खालीलप्रमाणे.

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त मत्स्यव्यवसाय | अध्यक्ष |
| २ | सह सचिव/ उप सचिव (मत्स्यव्यवसाय) | सदस्य |
| ३ | संबंधित प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय | सदस्य |
| ४ | मत्स्यव्यवसाय तज्ञ म्हापसू अथवा फिशरी कॉलेजचा प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | मत्स्यसंवर्धक/मत्स्यकास्तकार यांचा प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | संबंधित जिल्हयाचे सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय | सदस्य-सचिव |

सदर समितीची बैठक दर तीन महिन्यांनी अथवा आवश्यकतेनूसार अधिक वेळा होईल. सदर समितीची कार्यकक्षा हे तटीय जलकृषि प्राधिकरणाचे क्षेत्रातील संवर्धन केंद्रे वगळता इतर सर्व सवर्धन/संगोपन केंद्रासाठी राहील.

केंद्र शासनाच्या मत्स्यबीज प्रमाणीकरण व मत्स्यबीज केंद्राचे प्रमाणन प्रणाली २०१५ नूसार जसे या प्रणालीनूसार नोंदणी नसलेल्या मत्स्यबीज केंद्राचे अस्तित्व बेकायदेशीर (NULL & VOID) ठरविण्यात आले आहे. त्याचप्रमाणे महाराष्ट्रात देखील सदर प्रणाली अंतर्गत नोंदणी न केल्यास संवर्धकाचे अस्तित्व हे बेकायदेशीर (NULL & VOID) राहील.

ड. संवर्धनक्षम माशांचे जसे भारतीय प्रमुख कार्प, एअर ब्रिदिंग फिश, स्वदेशी प्रजाती तसेच परदेशातून आयात केलेल्या प्रजाती, गोडया तसेच निमखाऱ्या पाण्यातील कोळंबी, शोभिवंत मासे यांचे संवर्धन करण्यासाठी आवश्यक साठवणूक, संवर्धन संगोपन पध्दती असलेली मत्स्यबीज केंद्रे स्थापन करण्यासाठी मत्स्यबीज प्रमाणीकरण तसेच मत्स्यबीज केंद्राचे प्रमाणन ह्या प्रणाली अंतर्गत नोंदणी व प्रमाणन बंधनकारक आहे.

**प्रमाणन समितीचे कार्य / कार्यकक्षा**

अ. प्रमाणन कार्यक्रमानूसार राज्यात मत्स्यबीज उत्पादन केंद्र कार्यान्वित होत आहे. याबाबत खात्री करणे तसेच राज्यात प्रमाणन प्रणाली राबविण्यात काय अडचणी आहेत, त्या दूर करुन सदर प्रणाली राबविण्यासाठी योग्य कार्यपध्दती तयार करणे.

ब. प्रमाणन कार्यक्रम राबविण्यासाठी आवश्यक त्या मुलभूत सुविधा, मनुष्यबळ, निधी उपलब्धी करणे.

क. व्यक्ती अथवा एजन्सी यांना मत्स्यबीज केंद्राचे प्रमाणन करण्यासाठी, मुल्यमापन व अहवाल तयार करण्यासाठी प्राधिकृत करणे.

ड. बीज प्रमाणिकरण प्रणाली राबविताना येणाऱ्या कायदेशीर समस्यांचे निराकरण करणे.

इ. आवश्यकतेनूसार वेळोवेळी प्रमाणन पध्दतीत सुधारणा आवश्यक असल्यास त्याबाबत शिफारस करणे.

फ. प्रमाणन केलेल्या मत्स्यबीज उत्पादन केंद्रामधून प्रजनक, मत्स्यबीज खरेदी करुन संचयन करण्याचे दृष्टीने जागरुकता करण्यासाठी प्रबोधनात्मक कार्यक्रम घेणे.

ग. प्रजनकाची निवड व देखरेख, मत्स्यबीज उत्पादन पध्दती, चाचणी प्रक्रिया याबाबतची मार्गदर्शक सूचना (मॅन्युअल) तज्ञांकडून तयार करुन घेणे.

**संवर्धनक्षम माशांच्या प्रजाती गोडेपाणी तसेच निमखाऱ्या पाण्यातील कोळंबी व शोभिवंत मासे यांचे प्रजनन यासाठी मत्स्यबीज उत्पादन केंद्रांना परवानगी देण्याबाबतची मार्गदर्शक तत्वे व कार्यपध्दती.**

१. अर्जदाराने [शेतकरी/उद्योजक/सहकारी संस्था/ खाजगी व्यक्ती/ कंपनी (Private Limited, Public Limited & others) व मत्स्यबीज उत्पादन केंद्र स्थापन करण्याची इच्छा असणारे] यांनी भारतीय प्रमुख कार्प, एअर ब्रिदिंग फिश, गोडया अथवा निम खाऱ्या पाण्यातील कोळंबी, शोभिवंत मासे या सर्व प्रकारच्या बीजोत्पादन करणाऱ्यांनी मत्स्यबीज प्रमाणीकरण व मत्स्यबीज केंद्र प्रमाणन करण्यासाठी गठीत समितीने निश्चित केलेल्या विहित प्रपत्रात नोंदणी अर्ज करावा. (विवरण पत्र १).

२ मत्स्यबीज प्रमाणीकरणव मत्स्यबीज केंद्र प्रमाणन करणाऱ्या समितीने बीजोत्पादन केंद्राचे डिझाईन व ले आऊट, बीजोत्पादन केंद्राची क्षमता, कोणत्या प्रकारे संवर्धन/ उत्पादन करण्यात येणार आहे त्याबाबत तपासणी करुन, तसेच एखादया रोगाची अथवा इन्फेक्शन लागण झाल्यास ते मासे स्वतंत्र ठेवून त्यावर उपचार करण्याची व्यवस्था आहे किंवा कसे याची खात्री करुन मंजूरी देण्यात यावी.

३. बीजोत्पादन केंद्रावरुन मत्स्यकास्तकार, शेतकरी अथवा संस्था/ संघटना/संघ यांना बीज विक्री करण्याआधी त्याचे प्रमाणन करून घेणे बंधनकारक आहे.

४. प्रजनक सुस्थितीत राहून जगण्याचे प्रमाण वाढविण्यासाठी मिनरलचे प्रमाण योग्य राखणारे व सर्व घटक समाविष्ट असलेले खाद्य प्रजनकांना देण्यात यावे.

५. तटीय जलकृषि प्राधिकरण यांचे कार्यक्षेत्रात समाविष्ट नसलेल्या केंद्राचाच विचार प्रादेशिक स्तरीय शिखर समिती यांनी नोंदणीसाठी करावा.

६. नोंदणीसाठी असलेले केंद्र हे पूर बाधित क्षेत्रात नसावे तसेच ते अभयारण्य परीसरातील मोकळी जागा (Buffer Zone around sanctuary), जैविकदृष्टया राखीव जागा (Bio reserve), इको पार्क तसेच असुरक्षित पध्दतीने केंद्रातील पाणी वाहत्या पाण्यात सोडण्याची व्यवस्था त्याजोगे वाहते पाणी दुषित होईल अशा ठिकाणी असू नये.

७. देशातील प्रजातीसाठी मत्स्यबीज प्रमाणीकरण व बीजोत्पादन केंद्राचे प्रमाणन करणारी समिती ही गुणवत्ता युक्त बीज तसेच त्यासाठी चांगल्या प्रतीचे प्रजनक बीजोत्पादन केंद्रास उपलब्ध होण्याच्या दृष्टीने काम करत आहे. मात्र त्याचेव्दारे प्रमाणन केल्याशिवाय परदेशी जातीचे बीज घेतल्यास प्रमाणीकरणाच्या संपूर्ण प्रक्रियेस बाधक ठरेल.

८. प्रजनक साठा तलाव तसेच मत्स्यबीज संवर्धन व संगोपन तलाव याची देखरेख करताना खालीलप्रमाणे जैविक सुरक्षा मापदंड राखण्यात यावे.

८.१. संवर्धन तलावातून कॅनॉल/ नदी/ तलाव किंवा कोणत्याही नैसर्गिक जलस्त्रोतात प्रक्रियेशिवाय पाणी सोडण्यात येवू नये.

८.२ पक्षांपासून बीज वाचविण्यासाठी योग्य ती उपाय योजना करावी तसेच बीजाची चोरी किंवा पाण्याच्या मोठया प्रवाहापासून बीज वाचविण्यासाठी देखील योग्य ती काळजी घ्यावी.

८.३ पावसाळयात पाण्याच्या प्रवाहात अंडी, मत्स्यबीज, मासे तलावातून वाहून नैसर्गिक जलस्त्रोतात जावू नये यासाठी तलावाचे बांध उंच ठेवण्यात यावेत.

८.४ तसेच अंडी, मत्स्यबीज, मासे वाहून जावू नये म्हणून स्लुइज गेट ला योग्य आसाची जाळी बसविण्यात यावी.

८.५. ५.०० हे. पेक्षा मोठया केंद्रावर वापर केलेल्या पाण्यावर प्रक्रिया करण्याची यंत्रणा (ETP) उभारणे बंधनकारक आहे.

९. बीजोत्पादन केंद्र/ बीज संवर्धन केंद्र यांनी राज्य शासनाकडे विहित प्रपत्रात प्रमाणिकरणासाठी अर्ज करावा.

१०. संवर्धनक्षम जाती अथवा त्यांच्या प्रजातीसाठी प्रमाणिकरणासाठी स्वतंत्र अर्ज करणे आवश्यक आहे.

११. प्रमाणित केंद्रे त्यांच्या केंद्रावर उत्पादित झालेले बीज प्रमाणित करू शकतील व त्याचा Fish Mark हा होलोग्राम सहीत प्रमाणपत्रावर वापरतील.

१२. बीजोत्पादन/ बीज संवर्धन केंद्र ही जाती/ प्रजाती नूसार स्वतंत्रपणे करणे आवश्यक आहे.

१३. प्रमाणिकरण प्रक्रिया सुरु असताना बीज आणि प्रजनक साठा बाबत खालील बाबींची पडताळणी करण्यात येईल.

- उत्पादन परिमाणे व व्यवस्थापनाच्या विशिष्ट निकषाचे अनुषंगाने मानके तपासणे.
- रोगाचा फैलाव/ प्रसार होवू नये म्हणून पूर्व इतिहास पडताळणी
- एक पिकाच्या दृष्टीने रोग जनकांचे पर्यवेक्षण, पाण्याचा दर्जा याबाबत NSPAAD यांचे तज्ञासह तपासणी करुन खात्री करणे.
- कार्प तसेच कॅटफिश यांचे संदर्भांत संकरण व अनुवंशिक प्रगतीबाबत तपासणी.

१४. सुधारीत / संकरीत प्रजाती साठी देखील उपरोक्त नूसार पडताळणी करण्यात येईल.

१५. प्रमाणिकरणानंतर बीजोत्पादन केंद्रे त्यांची "Test Certificate" "Sealing Tags" तयार करतील.

१६. संवर्धन करुन बीज विकणाऱ्या मध्यस्थांनी मुळ बिज हे प्रमाणित बीजोत्पादन केंद्रातून उपलब्ध करुन घेणे बंधनकारक आहे. अशा मध्यस्थ केंद्राचे प्रमाणिकरण हे पर्यावरणीय व पाण्याच्या योग्यतेच्या मानकांची तपासणी करुन करता येईल.

१७. ज्या ठिकाणी मालकीत बदल होईल तेथे जुन्या तसेच नवीन मालकांनी मालमत्ता हस्तांतरीत केल्याबाबतच्या कागदपत्रासह समितीस माहिती सादर करणे आवश्यक राहील.त्यानूसार नवीन मालकाने केंद्राचे प्रमाणिकरण प्रमाणपत्र त्याचे नावे हस्तांतरीत होणेसाठी अर्ज करावा व सदर अर्जासोबत प्रमाणित केंद्रासाठी लागू असलेली सर्व मानके राखण्याबाबत नवीन मालकाने हमीपत्र सादर करणे बंधनकारक आहे. प्रमाणन समितीच्या सदस्यांनी तपासणी करुन शिफारस केल्याप्रकरणी ६० दिवसांत नोंदणीसाठी परवानगी देण्यात यावी.

१८. प्रमाणपत्राचे प्रदर्शन बिजोत्पादन केंद्राचे प्रमाणिकरणाबाबतचे प्रमाणपत्र हे बिजोत्पादन केंद्राचे दर्शनी भागावर लावावे.

१९. प्रमाणन रद्द करणे -खालील प्रकरणी केंद्राचे प्रमाणन रद्द करण्यात येईल.

अ) आवश्यकतेनूसार मुलभूत सुविधा उपलब्ध नसणे.
ब) वैध कारणाशिवाय सुविधा एक वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी कार्यरत नसणे.
क) प्रमाणन समितीने निश्चित केल्यानूसार गुणवत्ता मानकानूसार बीज नसणे.
ड) सक्षम प्रमाणन समितीने चुका निदर्शनास आणल्यानंतर त्यांची पूर्तता न करणे.
इ) केंद्रात सुविधा उपलब्ध करताना खाद्यातील प्रतिबंधित घटक तसेच प्रतिबंधित संप्रेरके,प्रतिजैविके, औषधनिष्ठा विषयक सक्रिय पदार्थ वापर आढळून आल्यास
फ) केंद्रातील मुलभूत सुविधा सुस्थितीत नसणे
ग) चुकीच्या माहितीच्या आधारावर प्रमाणन झाले असल्यास तसेच ज्या प्रजाती शासनाने संवर्धन करण्यास बंधी घातली आहे अशा प्रजाती आढळल्यास अथवा त्या अनुषंगाने संवर्धनाची कारवाई होत असल्यास प्रमाणन प्रमाणपत्र रद्द करण्यात येईल.

२०. **प्रमाणन पुन: प्रमाणीकरण**

केंद्राचे प्रमाणन हे ५ वर्षापर्यंत वैध आहे. वैधता कालावधीच्या समाप्ती नंतर त्यांच्या मान्यता प्रमाणनाची पूर्नतपासणी करण्यासाठी पुन्हा नव्याने अर्ज करणे आवश्यक आहे.

**रोग चाचणी अहवाल**

अ) कोणत्याही रोगाचा फैलाव झाल्यास केंद्र धारकाने प्रथम संबंधित सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचेकडे संपर्क साधुन अहवाल द्यावा. जाळी मारुन सर्व मासे काढून घ्यावे व तलावातून पाणी सोडण्याआधी त्यावर प्रथम प्रक्रिया करावी.
ब) केंद्रामध्ये वापरल्या जाणाऱ्या जाळी, भांडी, पिशव्या यांच्या निर्जंतुकीकरणासाठी व्यवस्था करावी.

क) कोणतीही खाजगी संघटन/ संस्था यांची रोगाची चाचणी व तपासणी संदर्भात स्विकारार्हता ठरविण्याबाबत मत्स्यव्यवसाय विभाग किंवा इतर संस्था जसे कि ICAR च्या संस्था, राज्य शासनाच्या प्रमाणित प्रयोगशाळा, विद्यापीठे यांनी प्रमाणित केलेल्या संस्था असणे आवश्यक आहे.

ड) प्रजननासाठी वापरुन झालेल्या प्रजनकासाठी स्वतंत्र तलाव ठेवावा.

इ) प्रजनकाची पुरेशा प्रमाणात उपलब्धता अथवा आदलाबदल करण्याची सोय असावी. प्रतिबंध असलेली औषधे व प्रतिजैविके यांचा वापर करु नये. एखादे वेळी रोग आढळल्यास त्यासाठी परवानगी असलेली औषध व प्रतिजैविके वापरून रोगावर इलाज करावा.

फ) उत्पादकता व त्यातील स्थिरता वाढविण्यासाठी कमी प्रमाणात संचयन केल्यास व्यवस्थापन खर्च कमी होवून रोगीचा प्रादुर्भाव देखिल टळतो.

ग) संवर्धनास सुयोग्य अशी प्रोबायोटिक्स वापरण्यात यावी.

२१. या प्रणाली अंतर्गत राज्य शासनाकडे नोंदणी असलेल्या बीजोत्पादन केंदानांच प्रमाणित बीजाची निर्मिती करता येईल.

२२. केंद्रावर ज्या प्रमाणित हॅचरी/ बीजोत्पादन केंद्रावरून बीज घेतले आहे त्याचा नाव व पत्ता अभिलेखी ठेवावा. तसेच पाण्याची गुणवत्ता, मापदंड, बीज, दैनिक खाद्य पुरवठा वेळापत्रक यांचे नोंदीचे अभिलेखे केंद्रावर ठेवण्यात यावी.

२३. सदर नोंदणी/ प्रमाणन/ प्रमाणिकरण यासाठी आवश्यक ती विवरणपत्र इंग्रजीमध्ये सोबत जोडली आहेत. त्यानूसार परिपूर्ण प्रस्ताव संबंधित सहायक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांना सादर करण्यात यावे व समितीने पुढील कार्यवाही करावी.

सोबत विवरणपत्रे - १ ते ६ जोडण्यात आली आहेत त्यानूसार बीजाचे प्रमाणीकरण व प्रमाणन बाबत पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०२१६०६२२१७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vijay K. Chaudhari
Date: 2018.11.02 16:12:35 +05'30'

**( विजय चौधरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
६. अप्पर मुख्य सचिव (महसूल) मंत्रालय, मुंबई ३२
७. प्रधान सचिव (वित्त) मंत्रालय मुंबई ३२
८. प्रधान सचिव (वने) मंत्रालय मुंबई ३२
९. प्रधान सचिव (ग्रामविकास) मंत्रालय मुंबई ३२
१०. सचिव (सहकार) मंत्रालय मुंबई ३२
११. प्रधान सचिव (आदिवासी विकास) मंत्रालय मुंबई ३२
१२. प्रधान सचिव (सामाजिक न्याय) मंत्रालय मुंबई ३२
१३. सचिव (जलसंपदा) मंत्रालय मुंबई ३२
१४. सचिव जलसंपदा (लक्षेवि) मंत्रालय मुंबई ३२
१५. आयुक्त मत्स्यव्यवसाय महाराष्ट्र राज्य, मुंबई
१६. आयुक्त सहकार पुणे
१७. सर्व विभागीय आयुक्त
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
२०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मत्स्योदयोग विकास महामंडळ, मुंबई
२१. सर्व आयुक्त महानगरपालिका
२२. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णाखोरे विकास महामंडळ सिंचन भवन पुणे
२३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
२४. कार्यकारी संचालक महाराष्ट्र विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
२५. कार्यकारी संचालक महाराष्ट्र तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
२६. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ ठाणे
२७. सर्व उपायुक्त, मत्स्यव्यवसाय
२८. सर्व विभागीय सहआयुक्त निबंधक सहकारी संस्था
२९. उपनिबंधक सहकारी संस्था (मत्स्य) आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई.
३०. सर्व जिल्हा सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था (दुग्ध)
३१. सर्व जिल्हा मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी
३२. महालेखापाल (लेखापरिक्षक / लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
३३. वित्त विभाग (व्यय २) मंत्रालय मुंबई ३२. / निवड नस्ती.

## विवरण पत्र-१

### बीजोत्पादन केंद्र/मत्स्यबीज केंद्र/इतर यांच्या नोंदणीसाठी अर्जाचा नमुना

| | | |
|---|---|---|
| १ | केंद्राचे नाव | |
| २ | केंद्राचा पत्ता | गाव: |
| ३ | | पोस्ट: |
| | | जिल्हा: |
| | | पिनकोड: |
| | | दुरध्वनी: |
| | | फॅक्स- |
| | | ई-मेल |
| | | मोबाईल |
| ३ | मालकी (शासकीय/संस्था/ व्यक्ती/ प्रायव्हेट लिमिटेड कंपनी/ संघ/इतर) | |
| ४ | व्यवसायिक नोंदणी (असल्यास) | |
| ५ | स्थापनेचे वर्ष | |
| ६ | केंद्राचे स्थान | गाव: |
| | | ग्रामपंचायत: |
| | | ब्लॉक: |
| | | पोलिस स्टेशन: |
| | | जिल्हा: |
| | | जवळील रेल्वे स्टेशन: |
| ७ | केंद्राचे विवरण | |
| | अ) एकूण क्षेत्र (जमिन) (हेक्टर) | |
| | ब) एकूण जलक्षेत्र (हेक्टर) | |
| | क) जमिन (हेक्टर) (मालकीची/ भाडेतत्वावर/ इतर) | |
| | ड) संवर्धन क्षेत्र | |
| | (i) प्रजनक मासे साठवणूक तलाव (संख्याक्षेत्र) | |
| | (ii) संगोपन तलाव (संख्या/क्षेत्र) | |
| | इ) बिजोत्पादन केंद्रातील मुलभूत सुविधा | |
| | (i) प्रजनक टाकी- (संख्या/क्षेत्र) | |
| | (ii) उबवणी टाकी -(संख्या/क्षेत्र) | |
| | (iii) मागील ५ वर्षापासून सांभाळलेल्या प्रजनकाचा तपशिल | |

| वर्ष | प्रजाती | नर/मादी | संख्या | सरासरी वजन | स्त्रोत |
|---|---|---|---|---|---|

| | | |
|---|---|---|
| ८ | पाण्याचा स्त्रोत (बोअरवेल/ जलाशय/ बंधारा/ कालवा/विहिर) | |
| ९ | उर्जा स्त्रोत (वीज/डिझेल/इतर) | |

| | | |
|---|---|---|
| १० | मागील ५ वर्षात केलेली बीज विक्री (प्रजातीनिहाय) | |
| | वर्ष | संख्या |
| मत्स्यजीरे | | |
| मत्स्यबीज | | |
| अर्धबोटुकली | | |
| बोटुकली | | |
| नॉप्लीया | | |
| पोस्ट लार्व्हा | | |

| | | | |
|---|---|---|---|
| ११ | प्रजनक साठयाची पुर्वमाहिती | | |
| | अ) प्रथम प्रजनकाचे मुळ | | |
| | (i) स्त्रोत (नदी/अवरुध्द पाणी/नैसर्गिक पाणी/संग्रह/हॅचरी/जलकृषि केंद्र) | | |
| | (ii) संग्रहाचे वर्ष व जागा | | |
| | (iii) प्रजनकाचा आकार/श्रेणी/संख्या | | |
| | ब) पुर्नस्थापनेची माहिती | | |
| | (i) स्त्रोत (नदी/अवरुध्द पाणी/नैसर्गिक पाणी/संग्रह/हॅचरी/जलकृषि केंद्र) | | |
| | (ii) संग्रहाचे वर्ष व जागा | | |
| | (iii) प्रजनकाचा आकार/श्रेणी/संख्या | | |
| | (क) स्वत:चा प्रजनक साठा उभारणी कार्यक्रम | वर्ष | संख्या |
| १२ | हॅचरी मॅनेजर अथवा प्रोप्रायटरची शैक्षणिक अर्हता व पुर्वानुभव | | |
| १३ | रोगाच्या फैलावाबाबतची पुर्वमाहिती (असल्यास) | | |

| वर्ष | रोग | विवरण/शेरा | कारण | उपचार/प्रतिबंधात्मक उपाय योजना |
|---|---|---|---|---|
| | | | | |

तारीख — अर्जदाराची स्वाक्षरी

शिफारस — प्रमाणित करण्यात येते की उपरोक्त माहिती माझ्या ज्ञानानुसार खरी व योग्य आहे.

तारीख — पदनाम, सही व शिक्का
सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय

अर्जासोबतची सहपत्रे

(१) मालक/मॅनेजर/अर्जदाराचे ओळखपत्र
(२) जागेच्या मालकीबाबतची कागदपत्रे
(३) हॅचरीची मालकी/भाडेकराराबाबतची कागदपत्रे

(४) हॅचरी/केंद्राचा नकाशा (ले-आऊट)

(५) व्यावसायिक नोंदणी (असल्यास)

(६) इन्कमटॅक्स क्लिअरन्स प्रमाणपत्र

(७) कामगार कार्यालयात नोंदणी (असल्यास)

(८) वित्तीय संस्थेला तारण/गहाण असल्यास वित्त पुरवठा करण्याचा पुरावा

(९) बाहेरुन पाणी पुरवठा आवश्यक असल्यास पाणी स्त्रोताबाबतच्या आवश्यक परवानग्या

(१०) प्रमाणीकरण करण्यासाठी नोंदणी फी-रु.५०००/- चा दर्शनीहुंडी/धनादेश (डिमांड ड्राफ्ट/चेक)

बीजोत्पादन केंद्र/मत्स्यबीज केंद्र/इतर यांचे प्रमाणन पुन: प्रमाणीकरण करण्याच्या अर्जाचा नमुना

| | | | |
|---|---|---|---|
| १ | केंद्राचे नाव | | |
| २ | केंद्राचा पत्ता | गाव: | |
| | | पोस्ट: | |
| | | जिल्हा: | |
| | | पिनकोड: | |
| | | दुरध्वनी: | |
| | | फॅक्स- | |
| | | ई-मेल | |
| | | मोबाईल | |
| २ | पुर्वी प्रमाणन केल्याचा क्र. व दिनांक | क्रमांक | दिनांक |
| ३ | मालकी (शासकीय/संस्था/ व्यक्ती/ प्रायव्हेट लिमिटेड कंपनी/ संघ/इतर) | | |
| ४ | व्यवसायिक नोंदणी (असल्यास) | | |
| ५ | स्थापनेचे वर्ष | | |
| ६ | केंद्राचे स्थान | गाव: | |
| | | ग्रामपंचायत: | |
| | | ब्लॉक: | |
| | | पोलिस स्टेशन: | |
| | | जिल्हा: | |
| | | जवळील रेल्वे स्टेशन: | |
| ७ | केंद्राचे विवरण | | |
| | अ) एकूण क्षेत्र (जमिन) (हेक्टर) | | |
| | ब) एकूण जलक्षेत्र (हेक्टर) | | |
| | क) जमिन (हेक्टर) (मालकीची/भाडे तत्वावर/इतर) | | |
| | ड) संवर्धन क्षेत्र | | |
| | (i)प्रजनक मासे साठवणूक तलाव (संख्याक्षेत्र) | | |
| | (ii)संगोपन तलाव (संख्या/क्षेत्र) | | |
| | ई) बिजोत्पादन केंद्रातील मुलभूत सुविधा | | |
| | (i)प्रजनक टाकी- (संख्या/क्षेत्र) | | |
| | (ii)उबवणी टाकी -(संख्या/क्षेत्र) | | |
| | (iii)मागील ५ वर्षापासून सांभाळलेल्या प्रजनकाचा तपशिल | | |

| वर्ष | प्रजाती | नर/मादी | संख्या | सरासरी वजन | स्त्रोत |
|---|---|---|---|---|---|

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | पाण्याचा स्त्रोत (बोअरवेल/ जलाशय/ बंधारा/ कालवा/विहिर) | | |
| ९ | उर्जा स्त्रोत (वीज/डिझेल/इतर) | | |
| १० | मागील ५ वर्षात केलेली बीज विक्री (प्रजातीनिहाय) | | |
| | | वर्ष | संख्या |
| मत्स्यजीरे | | | |
| मत्स्यबीज | | | |
| अर्धबोटुकली | | | |
| बोटुकली | | | |
| नॉप्लीया | | | |
| पोस्ट लार्व्हा | | | |
| ११ | प्रजनक साठयाची पुर्वमाहिती | | |
| | अ)प्रथम प्रजनकाचे मुळ | | |
| | (i)स्त्रोत (नदी/अवरुध्द पाणी/नैसर्गिक पाणी/ संग्रह/हॅचरी/जलकृषि केंद्र) | | |
| | (ii)संग्रहाचे वर्ष व जागा | | |
| | (iii)प्रजनकाचा आकार/श्रेणी/संख्या | | |
| | ब) पुर्नस्थापनेची माहिती | | |
| | (i)स्त्रोत (नदी/अवरुध्द पाणी/नैसर्गिक पाणी/ संग्रह/ हॅचरी/जलकृषि केंद्र) | | |
| | (ii)संग्रहाचे वर्ष व जागा | | |
| | (iii)प्रजनकाचा आकार/श्रेणी/संख्या | | |
| | (क)स्वत:चा प्रजनक साठा उभारणी कार्यक्रम | वर्ष | संख्या |
| १२ | हॅचरी मॅनेजर अथवा प्रोप्रायटरची शैक्षणिक अर्हता व पुर्वानुभव | | |
| १३ | रोगाच्या फैलावाबाबतची पुर्वमाहिती (असल्यास) | | |

| वर्ष | रोग | विवरण/शेरा | कारण | उपचार/प्रतिबंधात्मक उपाय योजना |
|---|---|---|---|---|

तारीख

अर्जदाराची स्वाक्षरी

शिफारस

प्रमाणित करण्यात येते की उपरोक्त माहिती माझ्या ज्ञानानुसार खरी व योग्य आहे.

तारीख

पदनाम,सही व शिक्का
सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय

अर्जासोबतची सहपत्रे

१. मालक/मॅनेजर/अर्जदाराचे ओळखपत्र
२. जागेच्या मालकीबाबतची कागदपत्रे
३. हॅचरीची मालकी/भाडेकराराबाबतची कागदपत्रे
४. हॅचरी/केंद्राचा नकाशा (ले-आऊट)
५. व्यावसायिक नोंदणी (असल्यास)
६. इन्कमटॅक्स क्लिअरन्स प्रमाणपत्र
७. कामगार कार्यालयात नोंदणी (असल्यास)
८. वित्तीय संस्थेला तारण/गहाण असल्यास वित्त पुरवठा करण्याचा पुरावा
९. बाहेरुन पाणी पुरवठा आवश्यक असल्यास पाणी स्त्रोताबाबतच्या आवश्यक परवानग्या
१०. पुन: प्रमाणीकरण करण्यासाठी नोंदणी फी-रु.५०००/- चा दर्शनीहुंडी/धनादेश
११. (डिमांड ड्राफ्ट/चेक)

विवरण पत्र-२

जिल्हातील मत्स्यबीज प्रमाणन आणी बीजोत्पादन केंद्र/मत्स्यबीज केंद्र/
मत्स्योत्पादन केंद्र/ इतर यांचे प्रमाणिकरण

अर्जदार श्री/श्रीमती. ................................................................. यांची/यांचे मत्स्यबीज प्रमाणन आणी बीजोत्पादन केंद्र/ मत्स्यबीज केंद्र/ मत्स्योत्पादन केंद्र/ इतर यांचे

प्रमाणिकरण व प्रमाणन प्रमाणपत्र मिळण्यासाठीचा अर्ज क्र...........दिनांक ................. यांची /यांचे(हॅचरी/बीजोत्पादनकेंद्र/मत्स्यबीजकेंद्राचेनाव)...................................................... ...................... पत्ता-..................................................ची तपासणि मी दिनांक ......................रोजी केली आहे.

२. केंद्राचा प्रकार - हॅचरी/ बीजोत्पादन केंद्र/मत्स्योत्पादन केंद्र ( कार्प/ एअर ब्रिदिंग फिश/ शोभिवंत मासे/ गोडया तसेच निमखाऱ्या पाण्यातील कोळंबी/इतर जलचर) ...........................................................................................................
३. बीजोत्पादन केंद्रावर उपलब्ध असलेल्या मूलभूत/ पायाभूत सुविधा (प्रत्येक बाबीसाठी जागेबाबत मीटर हे एकक वापरावे व प्रत्येक बाबीसाठी स्वतंत्र पानाचा वापर करावा.)
   (अ) पाण्याची टाकी- होय /नाही
   (ब) प्रजनन टाकी- होय /नाही
   (क) उबवणी टाकी- होय /नाही
४. प्रजनन प्रक्रिया, संगोपन व्यवस्थापन व प्रजनक व्यवस्थापनासाठी उपलब्ध तांत्रिक कर्मचारी वर्ग- संख्या ...............
५. एकूण क्षेत्र .............(हेक्टर) आणि जलक्षेत्र ................ .(हेक्टर) हे अर्जदाराच्या ताब्यात असून त्यात संगोपन केंद्र, संवर्धन केंद्र व प्रजनक साठवणूक तलाव यांचा समावेश आहे.
६. संभाव्य जल कृषी- पारंपारिक/ सुधारीत पारंपारिक/ सघन पध्दतीने
७. पाण्याची गुणवत्ता- चाचणी अहवाल/ विष्लेशन- समाधानकारक / असमाधानकारक
८. पूर्वी रोगाचा फैलाव झाला असल्यास त्याबाबतची माहिती

| अ. क्र. | नाव | वर्ष | उपचार | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | | | | |
| २ | | | | |
| ३ | | | | |
| ४ | | | | |
| ५ | | | | |

९. पाण्याचा स्रोत (कालवा/ बंधारा/ जलाशय/ नदी/ प्रवाह) हा जंतू मुक्त आहे
   होय /नाही
१०. प्रमाणन व प्रमाणिकरण साठीची फी रू. ५०००/-(रूपये पाच हजार मात्र) चा तपशील धानादेश/ दर्शनी हुंडी ................दिनांक.............बॅकेचे नाव.......................
   ठिकाण ................

(अ) फी......................... (ब) दंड.....................

११.खाद्याचे वेळापत्रक

(अ) प्रजनक साठा तलाच/संवर्धन तलाव/ संगोपन तलावात वापरले जाणारे खाद्याचे घटक चांगल्या दर्जाचे आहेत का

होय /नाही

(ब) संप्रेरके / प्रतिजैविके यांचा वापर (योग्य त्या प्रमाणानुसार ) -- होय /नाही

१२. जे मत्स्यबीज वाहून न्यायचे आहेत त्यास भरण्यासाठी पुरेशा प्रमाणात ऑक्सिजन उपलब्ध करण्यात येवंन मत्स्यबीज केंद्र सुसज्ज आहे का- होय /नाही

१३. मत्स्यबीजाच्या आरोग्याचे मूल्यमापन (मत्स्यजीरे/ मत्स्यबीज/ मत्स्यबोटूकली)¬

(अ) अति उत्कृष्ठ.........,(ब) उत्कृष्ठ .......... (क) अयोग्य

१४.अर्जदाराने प्रत्येक वेळी प्रमाणित वजने / कंटेनर यांचा वापर केला आहे का

होय /नाही

१५.अभिप्राय (असल्यास) (सुस्पष्ट नमुद करावे )

१५.१ अनुवंशिक प्रगती /अनुवंशिक पध्दतीने अवनत केलेले संकरण -केले आहे अथवा नाही

...........................................................

१५.२ बीजोत्पादन केद्रातील विकृत बीजाची टक्केवारी ................... (०.५ % पेक्षा कमी असणे आवश्यक )

(सही व पदनाम)

तपासणी अधिकारी

अर्जदाराच्या नावे अधिसुचना क्रमाक ............................................. नुसार प्रमाणपत्र दिले जाऊ शकते/ दिले जाऊ शकत नाही .

प्रमाणपत्र क्रमांक ......................................... दिनांक .............................

अर्जात माहीती / गठक पाहीले व सत्यापित केले. हॅचरि युनिट (बीजोत्पादन केद्र) च्या बाजुने बीज प्रमाणपत्र जारी करण्यासाठी आवश्यक आणि योग्य कारवाईसाठी शिफारस करून अग्रेषित.

सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय

............................. (जिल्हा.)

## <u>विवरण पत्र-३</u>

## बीजोत्पादन केंद्रासाठी प्रजातींची निवड करणे

सर्व प्रकारचे बीज हे निरोगी असावे बीजास कुठल्याही प्रकारे बाहेरूण संसर्ग नसावा, तसेच पोहण्याची क्षमता चांगली असावी व चपळ असावी

**शिफारस केलेल्या प्रजाती**

**१)कार्प :-**

१.१ (अ) भारतीय प्रमुख कार्प (कटला,रोहु, मिरगल)
कटला कटला, लेबीओ रोहिता, लेबीओ कालबसु , सिऱ्हयानस मिरगल,
(ब) मायनरकार्प(दुय्यम जातीचे कार्प ) - लेबीओ बाटा
(क) चायकनिज कार्प - सायप्रीनस कार्पीओ, हायपोथ्यालमिक्थस मोलिट्रिक्स (कोंबडा मासा आणि सिल्वर कार्प )

१.२ दोन वर्गीकारनात्मक प्रजाती जसे मादी कटला व नर रोहू या जातींच्या प्रजनकांचे बंदिस्त प्रजनन

१.३ सुधारित प्रजाती - एकाच प्रजातीच्या प्रृजनन कार्यक्रमाद्वारे विकसित केलेल्या अनुवंशिक व जैविक दृष्टया सुधारित प्रजाती

१.४ भारतीय प्रमुख कार्प बीज -

| प्रकार | आकार |
|---|---|
| मत्स्य जीरे (spawn) | ८ मीमी पर्यंत |
| मत्स्यबीजाची पूर्वअवस्था (Early fry) | ९-२५ मीमी |
| मत्स्यबीज (Fry) | २६-५०मीमी |
| सुधारित मत्स्यबीज (Advanced fry) | ५१-१०० मीमी |
| मत्स्यबोटुकली (Fingerling) | १०० मीमी पेक्षा जास्त |

(१ मीली मध्ये ८ मीमी आकाराचे ६०० नग मत्स्य जीरे असते)
प्रमाणन व प्रमाणिकरण समितीच्या मान्यतेशिवाय विदेशी जाती / प्रजाती यांचे पालन केल्यास ते संपूर्ण प्रमाणण प्रक्रियेस घातक ठरेल.

**२) (अ)एअर ब्रिदिंग फिश** अंतर्गत कॅटफिशच्या ३ प्रजाती येतात त्यापैकी २ प्रजातींचे व्यावसायिक दृष्टया संवर्धन केले जाते. त्या खालील प्रमाणे

१. मागूर- क्लेरिअस बेट्राकस
२. सिंगी- हेट्रोपेनिअस्टीस फॉसिलिस
३. कोई- ॲनॅबस टेस्टीडयुमस

अ. क्र. १ व २ व्यवसायिक दृष्टया किफायतशिर व १५ ते २० मीमी आकाराचे मत्स्यबीज ते सुयोग्य आकारमानाने आहे.

(ब) पंगेशियस - पंगेशियस हा कॅट फिश संवर्धनासाठी योग्य आहे

**३)गोडया पाण्यातील कोळंबी** मॅक्रो ब्राकियम रोझन बर्गी ही प्रजात महाराष्ट्रात गोडया पाण्यासाठी मोठया प्रमाणावर संवर्धनासाठी वपरण्यात येते व मॅक्रो ब्राकियम मालकमसोनी ही देखील संवर्धन क्षम प्रजाती आहे (आकारमान- ३०मीमी पेक्षा जास्त)

**४) निमखाऱ्या पाण्यातील कोळंबी**- मोठी टायगर कोळंबी- पिनियस मोनोडॉन, व्हाइट कोळंबी- फेनिरोपिनियस इंन्डिकस- ९ ते १० दिवसात पोस्ट लार्व्हा तयार होतो तर, पोस्ट लार्व्हा १५ ते २० हे आकारमान संच्चयनासाठी सुयोग्य आहे.

**५) शोभिवंत मासे** - जलीय प्रजाती ज्यांना व्यवसायिक मूल्य आहे व ज्यांचे जिवंतपणे प्रदर्शन करता येते . ते त्यांच्या वैविध्यपूर्ण रंग, आकार, स्वरूप, वर्तवणूक या लक्षानांमुळे प्रदर्शनिय दिसतात. सदर प्रजाती या गोडे पाणी,निमखारे पाणी व खाऱ्या पाण्यात आढळते.

उष्णकटीबंधीय शोभिवंत मासे जसे ॲगल फिश, गोरामी प्लेटिफिश सॉर्ड टेल, गोल्डि फिश, सियामीज फायटिंग फिश इत्यादी व याव्यतिरिक्त विविध स्वदेशी प्रजाती यांचा देखील शोभिवंत मासे म्हणून वापर होतो

**संचयन क्षमता :-**

**कार्प**- २ कीलोपेक्षा जास्त वजनाचे मासे हॅचरी मध्ये असावेत सदर माशांचे संचयन हे १००० ते ३००० किलो प्रती हेक्टर असे असावे

**कॅट फिश**- प्रती चौमी मध्ये २ ते ३ नग (आकारमान १५ ते २० मीमी)

**गोडया पाण्यातील कोळंबी** - प्रती चौमी मध्ये १ ते २ नग (आकारमान २० मीमी पेक्षा जास्त) (मऊ कवच, काळेडाग नसावे, नांग्या तुटलेल्या नसाव्यात)

**शोभिवंत मासे** -प्रती घनमी मध्ये ५० ते १०० नग(50-100/ $M^3$)

शेवाळविरहीत जमिनीमधून उपसा करण्यात येणाऱ्या पाण्यास प्राधान्य माशाच्या कारमानानुसार विश्लेक्षण अहवाल बंधनकारक,सतत एरेशन आवश्यक कोळंबी- हॅचरी मध्ये आर्टिमिया उबवणी तलाव आवश्यक.

**निमखारे पाण्यातील कोळंबी**

१ आरटिमिया हॅचिंग टँक ची व्यवस्था बीजोत्पादन केंद्रात असणे बंधनकारक

२ कॉरन्टाईन केलेला प्रजनक साठा अनुकूलन करणे

३ अलगल कल्चर टँक, ओले व सुके खादय साठवणूक सुविधा तसेच तपासणी प्रयोग शाळा असणे बंधनकारक

४ स्पॉनिंग व हॅचरी युनिट बंधनकारक.

**कोळंबी बीजोत्पादन (हॅचरी )मध्ये घेण्यात येणारी जैविक सुरक्षा बाबत उपाय.**

१ बाहेरूण आलेला सर्व साठा अलग ठेवणे आवश्यक

२ पिसिआर तंत्रज्ञानाचा वापर करून बाहेरूण आलेला सर्व साठा रोगमुक्त आहे याची पाहणी करणे.

३ बाहेरूण येणारे पाणी हे पॅथोजल फ्रि होण्यासाठी त्यावर प्रक्रिया करणे.

४ यंत्र सामग्री तसेच सर्व साधन सामग्री यांचे निर्जंतूकीकरण करून निट ठेवणे.

५ व्यक्तीक स्वच्छता राखणे जसे हात पाय धुणे इत्यादी.

**विवरण पत्र-४**

इष्टतम पाण्याची गुणवत्ता परिणामे

## १. कार्प मासे /एअर ब्रिदिंग मासे/ शोभिवंत मासे

| परिमाण | इष्टतम प्रमाण |
|---|---|
| पाण्याचे तापमान | २४.०-२९.० |
| सामू | ७.६-८.४ |
| विरघळलेले ऑक्सिजन (मि ग्रॅम/लि) | > ५ |
| कार्बनडॉयऑक्साईड (मि ग्रॅम/लि) | < १६.० |
| एकुण अल्कि ( मि ग्रॅम/लि) | १८.० - ११०.० |
| क्षारता (मि ग्रॅम/लि) | ७० - १०० |
| अमोनिया-एन (मि ग्रॅम/लि) | <०.२ |
| पोटॉशियम (मि ग्रॅम/लि) | >१.० |
| कॅल्शियम (मि ग्रॅम/लि) | २४.० - २८.० |
| सोडियम (मि ग्रॅम/लि) | ७.९ -९.० |
| लोह (मि ग्रॅम/लि) | < ०.२ |
| किटक नाशकांचे अवशेष | सीमीसीबी मानका नुसार अंघोळीचे पाणी |
| अवजड धातू | सीमीसीबी मानका नुसार अंघोळीचे पाणी |
| हायड्रोजन सल्फाइड | <०.१ |
| क्लोराइड | <१० मि ग्रॅम/लि. |

भुगर्भातील पाण्याचा थेट वापर योग्य असु शकत नाही. हॅचरी मध्ये भुगर्भातील पाण्याचा वापर करण्यापुर्वा, सदर पाणी जर प्रजननासाठी अथवा उबवणीसाठी वापरावयाचे असल्यास ते योग्य पध्दतीने फिल्टर करणे आवश्यक आहे.

## २. गोडया पाण्यातील कोळंबी साठी

| परिमाण | इष्टतम प्रमाण |
|---|---|
| पाण्याचे तापमान | २७.० -३१.० |
| सामू | ७.६ - ८.४ |
| विरघळलेले ऑक्सिजन (मि ग्रॅम/लि). | >५ |
| अमोनिया - एन (मि ग्रॅम/लि) | <०.१ |
| नायट्रेट-एन (मि ग्रॅम/लि) | <.१.०१ |
| लोह (मि ग्रॅम/लि) | <०२ |
| क्षारता | १२ - १४ |
| किटक नाशकांचे अवशेष | सीमीसीबी मानका नुसार अंघोळीचे पाणी |
| अवजड धातू | सीमीसीबी मानका नुसार अंघोळीचे पाणी |
| हायड्रोजन सल्फाइड | <१.० |
| क्लोराइड | <१० मि ग्रॅम /लि. |

## ३. निमखाऱ्या पाण्यातील कोळंबीसाठी

| परिमाण | इष्टतम प्रमाण |
|---|---|
| पाण्याचे तापमान | २८.० - ३२.० |
| क्षारता (ppt) | ३०- ३४ |
| सातू | ८.० -८.४ |
| विरघळलेले ऑक्सिजन (मि ग्रॅम/लि) | >४.० |
| किटक नाशकांचे अवशेष | सीमीसीबी मानका नुसार अंघोळीचे पाणी |
| अवजड धातू | सीमीसीबी मानका नुसार अंघोळीचे पाणी |
| अमोनिया-एन (मि ग्रॅम/लि) | <०.००१ |
| नायट्रेट-एन (मि ग्रॅम/लि) | <०.००१ |

# विवरण पत्र-५
# रोग व रोगजनकांसाठी स्क्रिनिंग
# (SCREENING FOR PATHOGENS AND DISEASES)
## (As per NSPAAD List)

**माशांचे रोग (Fish disease )**

| | | |
|---|---|---|
| १ | इपिझोटिक हिमॅाटोपॉयटिक नेक्रोसिस | Epizootic haematopoietic necrosis |
| २ | इन्फेक्शीयस हिमॅाटोपॉयटिक नेक्रोसिस | Infectious haematopoietic necrosis |
| ३ | स्प्रीग विरामिया ऑफ कार्प | Spring viraemia of carp (SVC) |
| ४ | व्हायरल हिमॅाटोपॉयटिक स्पेटिसेमिआ | Viral haemorrhagic septicaemia (VHS) |
| ५ | इपिझोटिक अल्सरेटिव्ह सिन्ड्रोम | Epizootic ulcerative syndrome (EUS) |
| ६ | रेड सिब्रेम इरिडिव्हायरल डिसिज | Red seabream iridiviral disease (RSID) |
| ७ | कोय हारपिस व्हायरस डिसिज | Koi herpesvirus disease (KHV) |
| ८ | ग्रुपर एरिडो व्हायरल डिसिज | Grouper iridoviral disease |
| ९ | व्हायरल इनसिफॅलोप्याथी एन्ड रेटिनो पॅथी | Viral encephalopathy and retinopathy |
| १० | एन्ट्रीक स्पेटिसेमिआ कॅट फिश | Enteric septicaemia of Catfish |
| ११ | इन्फेक्शन वीथ एरोमोनस हायड्रोफिला | Infection with Aeromonas hydrophilla |
| १२ | इन्फेक्शन वीथ एडवर सिल्ला टारडा | Infection with Edwardsiella tarda |
| १३ | इन्फेक्शन वीथ व्हायब्रीओ अन्गुल्यारम | Infection with Vibrio anguillarum |
| १४ | इन्फेक्शन वीथ फ़्लावोबॅकटेरियम कोलुमनरे | Infection with Flavobacterium columnare |
| १५ | इन्फेक्शन वीथ स्टेपटोकोकस इनियाई इन तिलापीया | Infection with Streptococcusइ iniae in Tilapia |
| १६ | इन्फेक्शीयस पॅन्क्रीएटिक नेक्रोसिस | Infectious pancreatic necrosis (Cold water) |
| १७ | इन्फेक्शन वीथ मायझॊबोलस स्पीसीज | Infection with Myxobolus spp. |
| १८ | इन्फेक्शन वीथ इक्थीओ पॅथीरस मल्टीफीलीस | Infection with Ichthyophthirius multifilis |
| १९ | इन्फेक्शन वीथ साप्रोलीनीया पॅरासायटीका | Infection with Saprolegnia parasitica |
| २० | इन्फेक्शन वीथ अर्गुलस स्पीसीज | Infection with Argulus spp |
| २१ | इन्फेक्शन वीथ डेक्टीलोगायरस स्पीसीज | Infection with Dactylogyrus spp. |
| २२ | इन्फेक्शन वीथ लर्निया स्पीसीज | Infection with Lernaea spp. |
| २३ | इन्फेक्शन वीथ क्यालीगस स्पीसीज | Infection with Caligus spp. |

(iii) **कवचधारी प्राण्यांचे रोग** (Crustacean diseases)

| | | |
|---|---|---|
| १ | तॊरा सिन्ड्रोम(टी एस) | Taura syndrome (TS) |
| २ | व्हाइट स्पॉट डिसिज (ड्ब्ल्यु एस डी) | White spot disease (WSD) |
| ३ | येलो हेड डिसिज (वाय एच डी) | Yellow head disease (YHD) |
| ४ | इन्फेक्शीयस हायपोडर्मल ॲड हिमॅटोप्यॅटिक नेक्रोसिस(आय एच एच एन) | Infectious hypodermal and haematopoietic necrosis (IHHN) |
| ५ | इन्फेक्शीयस मायो नेक्रोसिस (आय एम एन) | Infectious myonecrosis (IMN) |
| ६ | व्हाइट टेल डिसिज (एम आर एन व्ही) | White tail disease (MrNV) |
| ७ | नेक्रोटाझिंग हिपॅटोपॅनक्रियाटिस (एन एच पी) | Necrotising hepatopancreatitis (NHP) |
| ८ | मिल्की हिमोलिम्फ डिसिज ओफ स्पायनी लॉबस्टर (पॅनूलिरस स्पिसिज) | Milky hemaolynph disease of spiny lobster (Panulirus spp.) |
| ९ | मोनोडॉन स्लो ग्रोथ सिन्ड्रोम | Monodon slow growth syndrome |
| १० | ॲक्युट हिपॅटोपॅनक्रियाटिक नेक्रोसिस सिन्ड्रोम | Acute haeptopancreatic necrosis syndrome (AHPNS) |
| ११ | हिपॅटोपॅनक्रियाटिक पॅरोव्हायरस | Hepatopancreatic parovirus |
| १२ | मोनोडॉन बॅक्युलो व्हायरस | Monodon baculovirus |
| १३ | लुज शेल सिन्ड्रोम | Loose shell syndrome |
| १४ | सॉफ्ट शेल सिन्ड्रोम | Soft shell syndrome |
| १५ | गॅफ्केमिया | Gaffkemia |

